**नागरी सहकारी बँकांना एकरकमी कर्ज परतफेड योजना लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः युआरबी-१८०७/प्र.क्र.४५९(ब)/७-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक - १२ जून, २०२०

वाचा -

१. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. १०.०३.२००८
२. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. १४.०३.२००८
३. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. १४.०९.२०११
४. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. २३.०५.२०१२
५. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. २५.०९.२०१३
६. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. २१.०१.२०१५
७. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि. १६.०३.२०१६
८. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि. १५.११.२०१७ व शुध्दीपत्रक दि. २६/२/२०१८
९. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि. १९.१०.२०१८.
१०. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि. १७.७.२०१९.
११. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.ना.बँका/ १-सआ/एकरकमी परतफेड योजना/२०२०, दिनांक २७.०३.२०२०.

प्रस्तावना:-

राज्यातील नागरी सहकारी बँकांच्या अनुत्पादक कर्जामधील प्रभावी वसुलीसाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास शिफारस केल्याप्रमाणे एकरकमी कर्ज परतफेड योजना राबविण्यास यापुर्वी वेळोवेळी शासनाने मंजुरी दिलेली आहे.

नागरी सहकारी बँकांचे वाढते एन.पी.ए. कमी करण्याच्या दृष्टीने एकरकमी कर्ज परतफेड योजनेस वेळोवेळी मुदतवाढ दिल्यामुळे नागरी सहकारी बँकांचे वाढते एन.पी.ए. कमी होण्यास आतापर्यंत मदत झालेली आहे. नागरी सहकारी बँकांच्या थकबाकीदारांना या योजनेत सहभागी करून थकीत कर्ज खाती बंद करुन बँकांचा ताळेबंद सुधारण्यासाठी तसेच या योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्यासाठी नागरी सहकारी बँकांसाठी एकरकमी कर्ज परतफेड योजनेस मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. नागरी सहकारी बँकांच्या अनुत्पादक कर्जामधील प्रभावी वसुलीसाठी महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम १५७ नुसार प्राप्त झालेल्या अधिकारांचा वापर करुन राज्यातील नागरी सहकारी बँकांना भारतीय रिझर्व्ह बँकेच्या मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून सदर योजना अंमलात आणण्यापुरती महाराष्ट्र सहकारी संस्था नियम, १९६१ च्या नियम ४९ मधील तरतुदीमधून सूट देऊन नागरी सहकारी बँकांना शासन निर्णय समक्रमांक दिनांक १५.११.२०१७ व शासन शुध्दीपत्रक समक्रमांक दिनांक २६.०२.२०१८ नुसार मंजूर केलेल्या एकरकमी कर्ज परतफेड योजनेस दिनांक ३१.०३.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. दिनांक ३१.०३.२०१८ अखेर जी कर्जखाती अनुत्पादक कर्जाच्या संशयीत (Doubtful) किंवा बुडीत (Loss) वर्गवारीत समाविष्ट केलेली असतील अशा सर्व कर्ज खात्यांना ही योजना लागू होईल.

३. दिनांक ३१.०३.२०१८ अखेर अनुत्पादक कर्जाच्या -सबस्टॅन्डर्ड◦ वर्गवारीत समाविष्ट झालेल्या व नंतर संशयित व बुडीत वर्गवारीत गेलेल्या कर्जखात्यांना देखील ही योजना लागू होईल.

४. संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १५.११.२०१७ व शुध्दीपत्रक दिनांक २६.०२.२०१८ मधील इतर तरतूदी कायम राहतील. सदर योजनेअंतर्गत दिनांक २८.०२.२०२१ अखेर प्राप्त झालेल्या अर्जांवर दिनांक ३१.०३. २०२१ पर्यंत निर्णय घेण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१२१५२६५८०६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.06.12 15:36:40 +05'30'

**(रमेश शिंगटे)**

अवर सचिव तथा सहनिबंधक, महाराष्ट्र शासन

**प्रती,**

१. सर्व मा. विधान सभा सदस्य/मा. विधान परिषद सदस्य, विधानभवन, मुंबई ०३२.

२. मुख्य महाव्यवस्थापक (नागरी बँका), भारतीय रिझर्व्ह बँक, सेंन्ट्रल ऑफीस, १ ला मजला, गारमेंट हाऊस, वरळी, मुंबई-१८
३. उप मुख्य सरव्यवस्थापक, भारतीय रिझर्व्ह बँक, सेंन्ट्रल ऑफीस, १ ला मजला, गारमेंट हाऊस, वरळी, मुंबई-१८
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
६. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
७. मुख्य कार्यकारी अधिकारी व सचिव, दि महाराष्ट्र अर्बन को.ऑप.बँक फेडरेशन,लि., भारतीय क्रिडा मंदिर, ४ था मजला, पी.बी.नं ७१२०, वडाळा, मुंबई- ०३१ .
८. अध्यक्ष, दि महाराष्ट्र अर्बन को. ऑप. बँक असोसिएशन लि., मुंबई.
९. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई त्यांना विनंती करण्यात येते की, सदरहु शासन निर्णयास व्यापक प्रसिध्दी द्यावी.
१०. निवड नस्ती.

**प्रत :** माहितीस्तव,

१. मा. मंत्री (सहकार), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२. मा. राज्यमंत्री (सहकार), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
३. मा. प्र.स. (सहकार), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
४. निवड नस्ती, ७-स